GR-200407211452338001-0300

१९९४-९५ ते १९९७-९८ या कालावधीत १० चित्रपटांना देण्यात आलेली कायमस्वरुपी करमणूक शुल्कमाफी रद्द करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : ईएक्सएम-१००२/प्र.क्र.१०६/टी-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २५ फेब्रुवारी, २००३.

<u>शासन निर्णय</u> :-

सन १९९४-९५ ते सन १९९७-९८ या कालावधीत शासनाने खाली दर्शविलेल्या १० चित्रपटांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकापासून कायमस्वरुपी करमणूक शुल्कमाफी दिली होती :-

| अ.क्र | चित्रपटाचे नाव | शासन आदेशाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | भगवद्गीता - हिंदी | शा.नि., समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : ककमा-१०९४/१८११९/प्र.क्र.१७३/सां.का.-२, दिनांक ४-८-१९९४. |
| २ | सरदार - हिंदी | शा.नि., समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : ककमा-१०९४/२२७४१/[२०२]/सां.का.-२, दिनांक १२-९-१९९४. |
| ३ | डर - हिंदी | शा.नि., समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : ककमा-१०९४/१९७११/प्र.क्र.१८५/सां.का.-२, दिनांक ५-१०-१९९४ |
| ४ | हम आपके है कौन - हिंदी | शा.नि., समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : ककमा-१०९५/८४७/प्र.क्र.१२६/सां.का.-२, दिनांक १२-९-१९९५. |
| ५ | मानवींनी भवाई - गुजराथी | शा.नि., समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : ककमा-१०९५/२५५०९/सां.का.-२, दिनांक ७-१०-१९९५. |
| ६ | दिलवाले दुल्हनिया ले जायेंगे - हिंदी | शा.नि., समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : ककमा-१०९६/७७८/प्र.क्र.२८८/सां.का.-२, दिनांक २९-६-१९९६. |
| ७ | दि मेकींग ऑफ महात्मा - इंग्रजी | शा.नि., समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : ककमा-१०९६/प्र.क्र.३९३/सां.का.-२, दिनांक १०-९-१९९६. |
| ८ | दि मेकींग ऑफ महात्मा - हिंदी | शा.नि., समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : ककमा-१०९६/प्र.क्र.३९३/सां.का.-२, दिनांक ३-१०-१९९६. |
| ९ | सरदारी बेगम -उर्दु | शा.नि., समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : ककमा-१०९७/प्र.क्र.२८८/सां.का.-२, दिनांक १-९-१९९७. |
| १० | गुडीया - हिंदी | शा.नि., समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : ककमा-१०९७/प्र.क्र.२८९/सां.का.-२, दिनांक २४-१०-१९९७. |

२. उपरोक्त १० चित्रपटांना देण्यात आलेली कायमस्वरुपी करमणूक शुल्कमाफी मागे घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या काही काळ विचाराधीन होता. आता उपरोक्त १० चित्रपटांना देण्यात आलेल्या कायमस्वरुपी करमणूक शुल्कमाफीच्या निर्णयाचे पुनर्विलोकन करण्यात आले असून, सदर १० चित्रपटांना देण्यात आलेली कायमस्वरुपी करमणूक शुल्कमाफी मागे घेण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

३. सबब, शासन आता असे आदेश देत आहे की, वरील परिच्छेद क्रमांक-१ मध्ये नमूद केलेल्या १० चित्रपटांना देण्यात आलेली कायमस्वरुपी करमणूक शुल्कमाफी, या शासन निर्णयाच्या दिनांकापासून, रद्द करण्यात येत आहे. यापुढे मुंबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मधील तरतुदीनुसार सदर चित्रपटांच्या, खेळांवर विहीत दराने करमणूक शुल्क आकारण्यात येईल.

४. सर्व जिल्हाधिका-यांनी वरील परिच्छेद - १ मध्ये नमूद केलेल्या १० चित्रपटांना देण्यात आलेली कायमस्वरुपी करमणूक शुल्कमाफी रद्द करण्यात आली आहे, ही बाब त्यांच्या जिल्हयात सर्व चित्रपटगृह मालक व सर्व व्हिडीओ प्रदर्शन मालकांच्या तात्काळ निदर्शनास आणावी. तसेच वरील १० चित्रपट त्यांच्या जिल्हयात प्रदर्शित झाल्यास त्यावर विहीत दराने देय होणारे करमणूक शुल्क वसूल केले जाईल याची दक्षता घ्यावी.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने (त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५१५/०२/व्यय-९, दिनांक २६-४-२००२ अनुसार) निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(माधव काळे)
कार्यासन अधिकारी,
महसूल व वन विभाग.

प्रति,

१. सर्व विभागीय आयुक्त.
२. सर्व जिल्हाधिकारी.
३. सर्व पोलीस आयुक्त.

प्रतिलिपी :-

१. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

२. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. वित्त विभाग (व्यय-९ कार्यासन), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. सांस्कृतिक कार्य विभाग (सांका-२ कार्यासन), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. डॉ. टी. सुब्बारामी रेड्डी, भगवद्‌गीता या चित्रपटाचे निर्माते ६/३-२४९/५/ए-रोड नं.१, बंजारा हिल्स, हैद्राबाद-५०० ०३४.
६ 'सरदार' या चित्रपटाचे कार्यकारी निर्माता, मे. फाऊन्डेशन फॉर फिल्म्स् ऑन इंडियाज वॉर ऑफ इनडिपेंडन्स, सी-९, विरल अपार्टमेंट, एस. व्हि. रोड, अंधेरी (पश्चिम), मुंबई-४०० ०५८.
७. 'डर' या चित्रपटाचे निर्माते श्री. यश चोप्रा, यशराज फिल्म्स्, १७ विकास पार्क, जलपंखी सोसायटी, जुहू, मुंबई-४०० ०४९.
८. 'हम आपके है कौन' या चित्रपटाचे निर्माते, मे. राजश्री प्रॉडक्शन प्रा. लि., भावना, ४२२, वीर सावरकर मार्ग, प्रभादेवी, मुंबई-४०० ०२५.
९. 'मानविनी भवाई' या चित्रपटाचे निर्माते, मे. अरवल्ली चित्र, २, क्वीन्स लॉन, एस. व्हि. रोड, विलेपार्ले (प.), मुंबई-४०० ०५६.
१०. 'दिलवाले दुल्हनिया ले जायेंगे' या चित्रपटाचे निर्माते श्री.यश चोप्रा,प्रो. यशराज फिल्मस्, १७ विकास पार्क, जलपंखी सोसायटी, जुहू, मुंबई-४०० ०४९.
११. 'मेकिंग ऑफ महात्मा' या हिंदीत डब केलेल्या चित्रपटाचे निर्माते मॅनेजर (आय.ॲन्ड डी/व्ही एम) राष्ट्रीय फिल्म विकास निगम लि., डिस्कव्हरी ऑफ इंडिया बिल्डींग, नेहरु सेंटर, डॉ. ॲनी बेझंट मार्ग, वरळी, मुंबई - ४००० १८.
१२. 'मे.किंग ऑफ महात्मा' या इंग्रजी चित्रपटाचे निर्माते डेप्युटी मॅनेजर (आयएफडी), राष्ट्रीय फिल्म विकास निगम लिमिटेड, डिस्कव्हरी ऑफ इंडिया बिल्डिंग, नेहरु सेंटर, डॉ. ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई-४०० ०१८.
१३. 'सरदारी' बेगम या चित्रपटाचे निर्माते, मे. प्लस चॅनेल (इंडिया)लि., हॉरिझन बिजनेस सेंटर, ३७ जुहू बीच, मुंबई-४०० ००९.
१४. 'गुडीया' या चित्रपटाचे निर्माते, मे. प्लस चॅनेल (इंडिया)लि., हॉरिझन बिजनेस सेंटर, ३७ जुहू बीच, मुंबई-४०० ००९.
१५. निवडनस्ती, टी-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.